अपंग व्यक्ती (समान संधी, हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम, 1995 नुसार अपंगां-करिता शासकीय सेवेत पदांचा शोध घेण्यासाठी तज्ज्ञ समिती स्थापन करणे.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही–1098/प्र.क्र.14/98/16–अ,

मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 9 ऑक्टोबर 1998.

वाचा :– (1) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही–1097/प्र.क्र.12/97/16–अ, दिनांक 22 एप्रिल 1997.

(2) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही–1097/प्र.क्र.12/97/16–अ, दिनांक 2 मे 1998.

(3) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही–1098/प्र.क्र.14/98/16–अ, दिनांक 20 ऑगस्ट 1998.

**शासन निर्णय** :– महाराष्ट्र अपंग विकास मंच विरुध्द केंद्र शासन व इतर, याचिका क्रमांक 117/1998 मध्ये दिनांक 13 जुलै 1998 रोजी मुंबई उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार अपंग व्यक्तींना सुयोग्य असलेल्या पदांचा शोध घेण्याकरिता शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही–1098/प्र.क्र.14/98/16–अ, दिनांक 20 ऑगस्ट 1998 अन्वये एक तज्ज्ञ समिती स्थापन करण्यात आली आहे. या समितीमध्ये अशासकीय अंध शाळा चालविणा–या सेवाभावी संस्थेचे प्रतिनिधी तसेच अशासकीय वैद्यकीय सेवेतील व्यक्ती यांना सदस्य म्हणून नियुक्त करण्यात आले असून, त्या सदस्यांची नावे स्वतंत्रपणे सूचित करण्यात येतील असे नमूद करण्यात आले होते. आता या सदस्यांची नावे निश्चित करण्यात आली असून समितीवरील अशासकीय अंध शाळा चालविणा–या सेवाभावी संस्थेचे प्रतिनिधी म्हणून "नॅशनल असोसिएशन फॉर दि ब्लाईण्ड, 11, खान अब्दुल गफारखान रोड, वरळी सी–फेस, मुंबई 400 025" चा प्रतिनिधी व अशासकीय वैद्यकीय सेवेतील व्यक्ती या सदस्यपदी डॉ. एम.एल. सराफ, एम.एस., अस्थिव्यंग तज्ज्ञ, एम.सी.सी.एस., मानसेवी सल्लागार, मुंबई हॉस्पिटल, मुंबई यांची नियुक्ती करण्यास शासन मान्यता देत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शि.शा. हिरीजगनेर,
शासनाचे उप सचिव.

प्रति

मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्य मंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
मा. उप मुख्य मंत्री यांचे सचिव,
सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व विभागीय आयुक्त,

(कृ.मा.प.

शाममु–रोटा–साप्रवि–एच–943(5000–10–98)

सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायाल, मुंबई/खंडपीठ - औरंगाबाद, नागपूर,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/औरंगाबाद/नागपूर,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
अध्यक्ष, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई,
सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
सचिव, राज्य निवड मंडळ,
सर्व नगरपालिकांचे मुख्याधिकारी,
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,
सर्व शासकीय महामंडळे, कंपन्या, स्थानिक स्वराज्य संस्था व शासन अनुदानित मंडळे/संस्था,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

---

* पत्राने.

---

एच-943(5000-10-98)अ.